मागासवर्गीय सहकारी सूतगिरण्यांना दिर्घ मुदतीचे कर्ज वितरीत करण्याबाबत...
सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात सूतगिरण्यांना कर्ज मंजूर करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुतगि-२०१९/ प्र.क्र.२४५/अजाक

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २५ मार्च, २०२२.

वाचा -

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक - एमपीसी- १०९९/प्र.क्र. २४४/ विघयो-२ दिनांक ३०.०३.२०००
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक - सुतगि- २००३/५५५/प्र.क्र. ३३/ विघयो-२ दिनांक ०२.०७.२००४
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक - शाभाभां - १११६/प्र.क्र. २४/ टेक्स-१ (अ), दिनांक २३.०३.२०१६
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक - शाभाभां - १११६/प्र.क्र. २४/ टेक्स-१ (अ), दिनांक ३१.०३.२०१८
५) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.सकआ/ अजाउयो-१/ गोमासूगिरणी-माबीड/ कर्ज/ मंजुरी/२०१८-१९/ का-१४/१०८६५, दि. ०५.०७.२०१९
६) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र दिनांक १२.१०.२०२०.

प्रस्तावना-

महाराष्ट्र राज्यात १२ व्या पंचवार्षिक योजना काळात स्थापन झालेल्या व शासनाच्या सहकार व वस्त्रोद्योग विभागाने पुरस्कृत केलेल्या सहकार क्षेत्रातील मागासवर्गीय (अनुसूचित जाती) सूतगिरण्यांना तदर्थ पध्दतीने दिर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करण्यात येते. यासाठी शासनाने संदर्भाधीन दिनांक ३० मार्च, २००० व दिनांक २.७.२००४ च्या शासन निर्णयान्वये सुधारित अटी व शर्ती निश्चित केलेल्या आहेत. याशिवाय सूतगिरणीतील ७०% सभासद हे अनुसूचित जातीतील असणे आवश्यक आहे. अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना दीर्घ मुदतीचे कर्ज या योजनेकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी रुपये १९.१६ कोटी एवढी तरतूद करण्यात आली आहे.

अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना वित्तीय सहाय्य या योजनेअंतर्गत गोविंद मागासवर्गीय सहकारी सूत गिरणी मर्या., माजलगाव, जिल्हा बीड या सूतगिरणीची प्रकल्प किंमत रु.६१७४.२४ लक्ष इतकी आहे. सदर सुतगिरणी ही मागासवर्गीय प्रवर्गातील असल्याने सामाजिक न्याय विभागाच्या योजनेनुसार एकूण प्रकल्प किंमतीच्या ५:४५:५० या अर्थसहाय्याच्या सुत्रानुसासर रु.३०८७.१२ लक्ष इतके दिर्घ मुदतीचे कर्ज अनुज्ञेय आहे. परंतु या विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार स्वतःचे व शासकीय भागभांडवल जेवढे उभारले जाईल त्याच्या १:१ प्रमाणात दिर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करण्यात येते. प्रस्तुत सुतगिरणीला सहकार व वस्त्रोद्योग विभागाने संदर्भ व ४ अन्वये एकुण रु.१७२४.४० लक्ष भागभांडवल मंजुर केलेले आहे. त्या प्रमाणात

सदर सुतगिरणीस रुपये १९१६.०० लक्ष दिर्घ मुदतीचे कर्ज अनुज्ञेय आहे. त्यापैकी सदर योजने अंतर्गत वितरण व संनियंत्रण प्रणालीवर वितरीत करण्यात आलेला रुपये १९.१६ कोटी इतका निधी गोविंद मागासवर्गीय सहकारी सूत गिरणी मर्या., माजलगाव, जिल्हा बीड या सुतगिरणीस दिर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

गोविंद मागासवर्गीय सहकारी सूत गिरणी मर्या., माजलगाव, जिल्हा बीड या सूतगिरणीस रु.१९१६.०० लक्ष एवढे दीर्घ मुदतीचे कर्ज मंजूर करण्यात येत आहे.

२. प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम अदा करण्यासाठी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, देयकावर प्रती स्वाक्षरी करण्याचे अधिकारही त्यांना किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास देण्यात येत आहेत.

३. उपरोक्त निधी आहरीत केल्यानंतर आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी त्यांचे अधिनस्त ठेवावा व संस्थेने अटींची पूर्तता केल्यानंतर निधी संस्थेस वितरीत करावा.

४. या बाबीवर होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतुन भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक एन-४
६२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांच्या कल्याणासाठी कर्जे
०१, अनुसूचित जातीचे कल्याण
८०० - इतर कर्जे,
(०१) अनुसूचित जातींना कर्जे,
(०१) (०१) अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना कर्जे (कार्यक्रम)
(६२२५ ०२२ २), ५५ कर्जे व आगाऊ रकमा

५. संदर्भाधीन शासन निर्णयातील इतर अटी व शर्ती कायम राहतील. विहित अटी व शर्तीची पुर्तता झाल्यानंतरच निधी वितरीत करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५२/ व्यय १४, दिनांक २२/०२/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२५१८०७००७८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHWINI BHIMRAO YAMGAR

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSITANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f0b627b3230194fa84bd0e5b4eb590e81c2c15ce998ba19f4825b4ac3eee13ce, pseudonym=E4B65E741A4E068C8794948A6098246DB7DA095A, serialNumber=1E31BE6F920A3D606925AB728A537257F35F1F0BE19B929C1B0DDCBA1E89366B, cn=ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2022.03.28 13:15:43 +05'30'

**( अश्विनी यमगर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संचालक, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/बीड
६. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, बीड
७. जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, पुणे/बीड
८. प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मुंबई-३२
९. वित्त विभाग (अर्थोपाय/अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई
१०. अध्यक्ष/ सचिव, गोविंद मागासवर्गीय सहकारी सूत गिरणी मर्या., माजलगाव, जिल्हा बीड
११. निवड नस्ती, अजाक कार्यासन.